ई-साहीत्य प्रकाशन

वर्ष दुसरे अंक ११ वा

१५ मार्च २०१०

# मुखवटा







**संपादक**

सोनाली घाटपांडे (पुणे)

सौ. रेणूका खटावकर (रेपाळ)

**सह संपादक**

स्वप्ना कौल्हे (नाशिक)

भारती सरमळकर (मुंबई)

सचिन काकडे (मुंबई)

हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी.. netaksharee@gmail.com

# संपादकाच्या लेखणीतून

सोनाली घाटपांडे

## मुखवटा - The Mask

**The Mask** चित्रपट पहाता पहाता अचानक मनात आलं...........
खरोखरचं असा मुखवटा लावून जगता येतं, आपण जे नाही किंवा
जे आपलं अस्तित्व नाही ते करून दाखवता येत असेल?

आजच्या जगात मुखवटे पण इतके बेमालूम असतात की खरा चेहरा कोणता आणि
मुखवटा कोणता हे ओळखणं ही मुश्कील झालयं............

"मुखवटा" शब्द ऐकला की मला आठवतं ते लतादिदींच गाण .....

जब भी जी चाहे नयी दुनिया बसा लेते है लोग ।
इक चेहरे पे कई चेहरे लगा लेते है लोग ।।

चेहे-यावरचे भाव लपवण्यासाठी हा मुखवटा नक्कीच कामी येतो बरं का...........

प्रोफेशनल जगात वावरताना कसं वागायच हेच कदाचित ही कविता सांगत नसेल ना ?

आज सकाळी जाग आली तर
मनात काही टोचत होतं
डोक बधीर आणि सुन्न मन
माझचं मला जाणवत होतं

मग काय चढवला मुखवटा
केल्या संवेदना बधीर
आणि लागले कामाला
काय करणार शेवटी आम्ही प्रोफेशनल ना

दिवसभर आज तशीच वागत राहीले
मनाचं बोचलेपण साहतच राहिले
विचारले प्रश्न मनाला तरी उत्तरच मिळेना
काय करावे मला काहीच कळेना

विचार केला ही रे कुठली बोच ?
माझी कृत्य, नाती की अजून काही ............???

-सोनाली घाटपांडे



# मुखवटा

मुखवटे ही किती सुंदर दिसतात
सा-यांच्या छटा वेगवेगळ्या
काही भडक तर काहीक हलके
सगळेच मनाला भावणारे

या स्वार्थी जगामध्ये
मलाही एक मुखवटा शोधायचा आहे
रंगाच्या छटा जरी मोहक असल्या
तरी ह्या रंग छटांशी दूर त्याला ठेवायचा आहे

भरायचे आहेत त्यात रंग
निखळ मैत्रीचे, प्रेमळ शब्दांचे
निर्मळ मनाचे, ख-या भावनांचे
अतूट बंधाचे, हळव्या हृदयाचे

- **दर्शना विजयकुमार**





मुखवटा प्रत्येकालाच असतो
घरात असताना एक
ऑफिस मध्ये दुसरा
मित्रांमध्ये तिसरा................
आपल्या सोईनुसार बदलतात मुखवटे
कधी वाटते मुखवटा नकोच
मी आहे तसाच दिसू दे ना
कशाला लपवायचा चेहरा ?
चेहरा पारदर्शी हवा
जे मनात आहे ते चेह-यावर दिसावे
का लपवायच्या भावना ?

मुखवटा घातला तरी
चेहरा, भावना जगापासून लपवता येतील
स्वतःच्या मनातून तर काही लपणार नाही ना ?
मग कशाला हवा मुखवटा ?

- **नितीन पवार**

# चेहरा आणि मुखवटा

तू भेटलास असा
नवा चेहरा घेऊन
प्रीतीच्या जाणीवांना
भावात आणून

जाणलेस तू माझे
तुझी होऊन उरताना
अस्पष्ट चित्राचे
चेह-यात रंग भरताना

तू दिलीस स्वप्ने
नसताही माझी झाली
अनोळखी चेह-याची
स्वप्नांसाठी ओळख आली

अकस्मात आले वादळ
दुरावत चालल्या वाटा
ओळखीच्या चेह-याचा का
माग घेई मुखवटा ?



कसे साहू आरोप हे
बदनाम तुझा चेहरा ?
कदाचित स्वार्थात मला
मुखवट्यानेच केला मोहरा !
इतकेच नको समजूस
चेहरे जे ख-याचे
नको चित्र रेखाटूस
नसलेल्या चेह-याचे

जगते या आशेत
ओळखशील चेहरा माझा
सत्याच्या आरशात
पाहशील चेहरा तू, तुझा

भेटेन पुन्हा चेह-यात मी
होईन तुझाच आरसा
न ठेवणार आता
मुखवट्यावर भरवसा !

- **प्रीती खेडेकर**

# मुखवटा

का कुणास ठाऊक ?

काही केल्या सापडतच नाहीय

हम्म्म्म्म …………

इथेच ठेवते काढून नेहमी …………

माझ्या उश्याशी रात्रभर

निदान रात्रीतरी

स्वतःशीच थोड्या गप्पा मारता येतील म्हणून

स्वतःला नीटस बघता येईल म्हणून

मग ना निवांत झोप लागते

पण…………

आता उजाडलयं

कशी पडू घराबाहेर त्याच्याशिवाय ?

सवय झालीय म्हणा न त्याची

त्याच्या रंगीबेरंगी चेह-याची

कारण …………

लपवतो तो………सर्वकाही त्या रंगामध्ये

आतलं युध्द, आतली तगमग

आतले अश्रू आणि आतल हसू सुध्दा

अरे हे असं का होतय?

"मी" तर मीच आहे मग

मग हा आरसा मला ऑळखत का नाहीय?

घेऊन गेला वाटतं तो "मुखवटा"

माझं मी पण

माझं स्वत्व

आणि ठेऊन गेलाय मागे

एक चेहरा

ज्याला ना ओळख आहे

ना कुठलं अस्तित्व

- **भारती सरमळकर**



# जगण चाललयं



मला हसवणा-याची वाट पहातोय

जगण चाललयं, हसत खेळत

रोज नवीन मुखवटा घालतोय

हसवतोय सगळ्यांना दिलखुलास

मला हसवणा-याची वाट पहातोय

हरेक वळणावर थांबलो, अडलेली मदत करायला

कुणी तर नेलं मज त्यांच्या स्वप्नात फिरायला

आता या शहराच्या गल्ल्यांमध्ये मात्र एकटाच भटकतोय

अन मला हसवणा-याची वाट पहातोय

आज मी कुणाचा, परवा तिस-याचा

करमणूक एकच उपयोग मा बिचा-याचा

निस्वार्थ, बिस्वार्थ, सब झूठ

माझ्या प्रेमाच्या बदल्यात थोड प्रेम मागतोय

अन मला हसवणा-याची वाट पहातोय



भलतेच गंभीर वाक्य ऎकून मंडळी बेफाम

चिंटूमुखातून कसे ओघळले सूर हे बदनाम

वा ! वा ! म्हणून सोडून द्याल

खर मनातलं सालं  मी ही उगाचं लिहीतोय

ठरवलय, अजून हसवेन सगळ्यांना

आत्ताच त्या हास्याची मुक्त साद ऎकतोय

**अभिजीत गलगलीकर**

# चेहरे आणि मुखवटे

अनामिक , अनोळखी

चेह-यांचे रोजचेच मुखवटे

मुखवट्यांची सारखीच घडण

सारखीच ठेवण

एकाच, सभ्यतेच्या कारखान्यातून

पांढरपेशेपणाची फक्त छाप घेऊन वावरतात

प्रत्येक मुखवटा एकमेकांना ओळखतो स्वतः इतकाच

आणि बहूदा आतला पण जाणतो त्यांचे रूप

थोडाफार सावळा गोरा फरक असेल

पण तो पुरेसा आहे इतर मुखवटे उतरवू बघायला

कुणी चेहरा वर आलाचं तर मात्र

मुखवटे फिके पडू लागतील

सगळे गोरे सावळे रंग मिसळतील एकमेकात

कदाचित त्या चेह-यावर त्यांचा रंग तरी चढवू पाहतील

किंवा मुखवटा तरी

त्या सभ्यतेच्या कारखान्यातला पांढ़रपेशेपणाची केवळ छाप असलेला

- सुरूची नाईक





खेळ मुखवट्यांचा

खेळ लहान मुलांचा

खेळ भातुकलीचा

खेळ लपंडावाचा

पण खेळ मुखवट्यांचा ?

कधी फुलवती हास्य

कधी पाझरती अश्रू

चेह-याचे व्यंग़ बदलती

असा कसा हा ख़ेळ ?

जगावे जीवन सुख दुःखात

त्यात बदलती अनेक चेहरे

चेहरे हात देऊन साथ देणारे

चेहरे अंधारात ढ़कलून देणारे

कधी संपतच नाही का हा खेळ

जेथे असे एक मुखवटा

त्याच्याच मागे असे अनेक

कधीच संपणार नाही हा खेळ

जिथे असतील प्रेमळ भावना

जिथे असतील दुःख , अश्रू

बदलत राहील व्यंग त्याचे

अन चालूच राहील तो खेळ

खेळ त्या मुखवट्यांचा

# संपादकाच्या लेखणीतून

सौ. रेणूका खटावकर [रेपाळ]

"मुखवटा" खायचे एक आणि दाखवायचे दुसरे या अर्थी हा शब्द वापरला जातो. जसं एखादं झाड म्हटल की त्यामागे त्याची पानं, फुलं, फळं येतात तसचं या शब्दामागे खूप वेदना, फसवणूक, भुलावळ असते. या जगात प्रत्येकजण कोणता ना कोणता मुखवटा लावूनच जगत असावा.

कोणी चांगल्या तर कोणी वाईट कारणासाठी असे मुखवटॆ वापरतात, तर काहींना वापरावे लागतात.......कारण काहीही असो, मुखवटॆ गरजेचे झाले आहॆत हे मात्र खरं. राजकारणी, मायनगरीतील लोक सर्रास असे मुखवटे वापरतात हे सांगणे न लगे ! हेव नव्हेत तर आपले नातेवाईक, मित्र, शेजारी, अगदी वर्षानुवर्ष ओळखत असणारे आपले सख्खे ही मुखवटॆ वापरत असतात, आणि असे मुखवटॆ जास्त दुःख आणि धक्का देतात हे मात्र खरं.

इतरांच सोडा ! जर आपल्याला जवळच्या कोणी दगा दिला तर त्याच्या मुखवटयामागचा भयानक चेहराच ठेच देतो इतका की मग म्हणावस वाटतं ' हमे तो अपनोंने लूटा, गैरोंमे कहां दम था ! कश्ती वहां डूबी जहां पानी कम था ! ' असं म्हणत म्हणतं आपणही एखादा मुखवटा चढ़वून घेतो कळतं – नकळतं आणी या गर्दीतलेच एक होऊन जातो. पर्याय नसतो म्हणून म्हणा किंवा आपाण खरे आहोत हे कोणाला पटत नसते म्हणून म्हणा...... काहीही असो आपणही एक मुखवटाचं असतो, फक्त एकदा नॉक नॉक करून स्वतःच्या मनाला विचारून पहा.

चला मुखवटा चढवताय ना ? ओह ! हा मुखवटाच आहॆ हॊय ? असू दे मुखवटयामागचा चेहेरा खरा असला म्हणजे झाल ! हल्ली चेहरेसुध्दा बदलतात म्हणे लोकं !






रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास 'नेटाक्षरी' जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणा-या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय, नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ५०,००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्या व्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करुन वाचणा-यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतु असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार ही इच्छा. आपल्या सारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

***ई-साहित्य प्रतिष्ठानची इतर विनामूल्य ई-साप्ताहिके* : स्वरनेटाक्षरी ऑडियो अल्बम, हास्य नेटाक्षरी, बालनेटाक्षरी**
***प्रसिद्ध झालेली ई-बुक्स* :टल्लीची शाळा, मकरंदच्या त्रिवेण्या, ग्रेव्हयार्ड लिटरेचर, चार क्षण, तो आणि ती, प्रियेचे अभंग, देशी दारुचे दुकान**

